**जायकवाडी पाणलोट क्षेत्रातून पूर्नवसित केलेल्या शेवता, ता. पैठण, जि. छत्रपती संभाजीनगर येथील महादेव मंदिराच्या पुर्नबांधणी कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
**शासन निर्णय क्रमांक: स्मारके २०२४/प्र.क्र.९७/सां.का.३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक : १५ मार्च, २०२४**

**वाचा :** संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. जा.क्र.स्मारके २०२४/९०३, दिनांक ०५.०३.२०२४

**प्रस्तावना:-**

शेवता हे गाव छत्रपती संभाजीनगर जिल्ह्यातील पैठण तालुक्यातील पैठण शहराच्या उत्तर पश्चिमेस २० कि.मी अंतरावर गोदावरी नदीच्या उत्तर तिरावर होते. जायकवाडी प्रकल्प योजनेतील पाणलोट क्षेत्राखाली सदर गाव येत असल्यामुळे सदर गावाचे स्थलांतर करण्यात आले. गावाच्या स्थलांतरासोबतच पाणलोट क्षेत्रात विस्थापित होणाऱ्या १३/१४ व्या शतकातील हेमाडपंथी मंदीराच्या प्रकल्पात बुडणाऱ्या मंदीराच्या वास्तूंचे स्थलांतर पुर्नबांधणी करण्याच्या दृष्टीकोनातून वर्ष १९७३ या वयांत छत्रपती संभाजीनगर येथील सोनेरी महाल परिसरात स्थलांतरीत करण्यात आले. जायकवाडी पाणलोट क्षेत्रातून वर्ष १९७३ या काळात विस्तापित करण्यात येऊन शेवता व सावखेडा येथील ही शिव मंदिर मराठा स्थापत्य कलेचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या हेमाडपंथी प्रकारात असून शेवता येथील कलाकुसरींनी युक्त आहे. एकंदरीत सदरील वास्तु अवशेष हे तत्कालीन स्थापत्य शैलीच्या वैभवाची साक्ष देणारी आहे. या विभागाकडून जायकवाडी पाणलोट क्षेत्रातून स्थलांरित करण्यात आलेले स्मारकाचे स्थलांतर हे महाराष्ट्रात प्रथमच बहुदा भारत आणि आशिया खंडात सुध्दा अशाप्रकारचे स्थलांतर दुसऱ्यांदा केले गेले असावे.

सद्य:स्थितीत जायकवाडी पाणलोट क्षेत्रातून पुर्नवसित करण्यात आलेल्या शेवता व सावखेडा येथील महादेव मंदिराचे अवशेष सोनेरी महाल परिसरात ठेवण्यात आले असून अवशेषांची उन, वारा पाऊस यामुळ झीज होत आहे. भविष्यात मंदिर अवशेष नामशेष होण्याची भिती नाकारता येत नाही. त्यामुळे जायकवाडी पाणलोट क्षेत्रातून पूर्नवसित केलेल्या शेवता येथील महादेव मंदिराच्या पुर्नबांधणी कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

या शासन निर्णयान्वये जायकवाडी पाणलोट क्षेत्रातून पूर्नवसित केलेल्या शेवता येथील महादेव मंदिराच्या पुर्नबांधणी कामाच्या रु.३,५६,९३,७४७/- (अक्षरी रूपये तीन कोटी छप्पन लाख त्र्यान्नव हजार सातशे सत्तेचाळीस मात्र) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. या साठी होणारा खर्च मागणी क्र झेडडी-०२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृती (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक व संरक्षण (कार्यक्रम) २२०५ १३०२ २७ लहान बांधकामे या लेखाशिर्षात त्या त्या वर्षी उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. हा वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) “अ” नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१५१९०१३६५९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT,
2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.03.15 19:10:38 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.मंत्री (सां.का.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (सां.का.), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई
सहायक संचालक, पुरातत्व विभाग, छत्रपती संभाजीनगर
महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
महालेखापाल-१, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल-२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर
अवर सचिव (अर्थसंकल्प),पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, सां.का.३